नव्याने निर्माण केलेला राज्य निवडणूक विभाग रद्द करणे व मुख्य निवडणूक अधिकारी कार्यालयासाठी १२८ पदांची केलेली पदनिर्मिती कायम ठेवणे...

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

## शासन निर्णय क्रमांकः आढावा-१८१९/प्र.क्र.१७/१९अ

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३३
तारीख: १९ नोव्हेंबर २०२०

वाचा : शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक-आढावा-१८१९/प्र.क्र.१७/१९अ, दिनांक १४ ऑगस्ट २०१९

**प्रस्तावना**

सामान्य प्रशासन विभागाने प्रशासकीय सोयीच्या दृष्टीकोनातून राज्य निवडणूक विभाग स्वतंत्र करण्याचा व निवडणूक शाखेसाठी १२८ पदे निर्माण करण्याचा मंत्रिमंडळ प्रस्ताव मुख्य निवडणूक कार्यालयाच्या सहमतीनंतर सादर करण्यात आला होता. त्यानुसार दिनांक ७ ऑगस्ट २०१९ रोजी झालेल्या मंत्रिमंडळ बैठकीतील विषय क्रमांक-८ अन्वये राज्य मंत्रिमंडळाने दिलेल्या मान्यतेनुसार दिनांक १४ ऑगस्ट २०१९ च्या शासन निर्णयान्वये “राज्य निवडणूक विभाग” निर्माण करण्यात आला व त्या विभागासाठी १२८ पदे नव्याने निर्माण करण्यात आली आहेत.

२. मुख्य निवडणूक कार्यालयात नव्याने पदे निर्माण करण्याचे भारत निवडणूक आयोगाचे निर्देश असून, आयोगाने नवीन विभाग निर्माण करण्याचे निर्देशही दिलेले नाहीत. तसेच मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य यांनीही नवीन विभाग तयार करण्याबाबत प्रस्ताव सादर केलेला नाही. यास्तव “राज्य निवडणूक विभाग” असा नव्याने विभाग निर्माण करण्यात येऊ नये अशी विनंती प्रधान सचिव व मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य यांनी केली आहे. त्यानुषंगाने दिनांक १४ ऑक्टोबर २०२० च्या मंत्रिमंडळ बैठकीत तसा प्रस्ताव मंजुरीस्तव सादर करण्यात आला होता.

**शासन निर्णय**

शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक-आढावा-१८१९/प्र.क्र.१७/१९अ, दिनांक १४ ऑगस्ट २०१९ अन्वये स्वतंत्र "राज्य निवडणूक विभाग" निर्माण करण्यास दिलेली मान्यता या शासन निर्णयाव्दारे रद्द करण्यात येत आहे.

२. राज्य निवडणूक विभाग रद्द करण्यात आल्यामुळे, दिनांक १४ ऑगस्ट २०१९ च्या शासन निर्णयात खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहेत.

२.१. सदर शासन निर्णयातील परिच्छेद-४, ५, ७ व ८ रद्द करण्यात येत आहे.

२.२. सदर शासन निर्णयातील परिच्छेद-६ मधील स्वतंत्र राज्य निवडणूक विभागासाठी रु.१.०२ कोटी इतक्या अनावर्ती खर्चास दिलेली मंजुरी रद्द करण्यात येत आहे.

२.३. सदर शासन निर्णयातील उर्वरित बाबी यथास्थिती लागू राहतील.

३. हा शासन निर्णय, मा.मंत्रिमंडळाने दिनांक १४ ऑक्टोबर २०२० च्या ४१ व्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१११९१२५४०२०३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VILAS RAMDAS THAKUR

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, postalCode=400032,
street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=c8b1e52c5c4f922ab6eb7a0b44101c838aea34f29fbff0aebe9d85c3de3468c2, ou=GENERAL ADMINISTRATION DEPT,
o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VILAS RAMDAS THAKUR
Date: 2020.11.19 12:56:28 +05'30'

(वि.रा.ठाकूर)
**शासनाचे उपसचिव.**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३) सर्व मा.मंत्री / मा.राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक.
४) मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद / विधान सभा, विधानभवन, मुंबई.
५) सर्व मा.विधान परिषद सदस्य / मा.विधान सभा सदस्य, विधान भवन, मुंबई.
६) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
७) सर्व मंत्रालयीन विभागांचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव.
८) प्रधान सचिव व मुख्य निवडणूक अधिकारी.
९) प्रधान सचिव, विधान परिषद / विधान सभा, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई.
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
११) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
१२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
१३) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
१४) ** प्रबंधक, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई.
१५) ** प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई.
१६) ** प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई / नागपूर / औरंगाबाद.
१७) ** प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
१८) ** सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
१९) ** आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालय, मुंबई.
२०) मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२१) सर्व आयुक्त, राज्य माहिती आयोग.
२२) राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२३) सर्व विभागीय आयुक्त / सर्व जिल्हाधिकारी, महाराष्ट्र राज्य.
२४) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
२५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
२७) मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
२८) बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई-१.
२९) भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ., बॅरॅक क्रमांक-१, योगक्षेमसमोर, वसंतराव भागवत चौक, नरीमन पॉईंट, मुंबई-२०.
३०) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४ राजभुवन, एस.व्ही.पटेल रोड, मुंबई-४.
३१) भारतीय कम्यनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई-१३.

३२) इंडियन नॅशनल काँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश काँगेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-२५.
३३) नॅशनलिस्ट काँग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पॉईंट, मुंबई-२१.
३४) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-२८.
३५) सर्व मंत्रालयीन विभाग.
३६) कक्ष अधिकारी (कार्यासन-आपुक व व्यय-४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३७) सर्व सहसचिव / उपसचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३८) निवडनस्ती / कार्यासन-१९अ.

*** * पत्राने**